**रंगभूमी प्रयोग परिनिरीक्षण मंडळ, मुंबई या कार्यालयातील नाट्यसंहितांचे संगणकीय जतन करण्याच्या खर्चास वित्तीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एसपीबी-२०२४/प्र.क्र.३८/ सां.का.१**
मंत्रालय (विस्तार), मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १३ फेब्रुवारी, २०२५.

वाचा :-

१. शासन ज्ञापन, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्रमांक: एसपीबी-२०२४/प्र.क्र.३८/ सां.का.१, दि.०९ जानेवारी, २०२५.
२. सचिव, रंगभूमी प्रयोग परिनिरीक्षण मंडळ,मुंबई यांच्या दि. ०६ जानेवारी, २०२५ रोजीचे पत्र.

प्रस्तावना :-

रंगभूमी प्रयोग परिनिरीक्षण मंडळाकडून सार्वजनिक ठिकाणी सादर होणा-या मनोरंजनाच्या कार्यक्रमांसाठी (नाटक/एकांकिका/लोकनाट्य/ स्वलिखित गीते इत्यादी) नागरिकांनी तपासणीसाठी सादर केलेल्या संहितांचे पूर्वपरिक्षण करुन त्यांना कायमस्वरुपी योग्यता प्रमाणपत्र देण्यात येते. अशा पूर्वपरिक्षण केलेल्या संहितेच्या प्रतींचे / प्रमाणपत्रांचे व परिक्षण केलेल्या सदस्यांच्या अभिप्रायांचे कार्यालयात जतन करुन ठेवण्यात येते.

सदर कायमस्वरुपी जतन करावयाच्या दस्तावेज (संहिता/प्रमाणपत्र व त्यांच्या नोंदवहया इत्यादी) यांचे संगणकीकरण (Digitization) रंगभूमी प्रयोग परिनिरीक्षण मंडळामार्फत करण्यात येते. दि. ०१ मार्च, २०२४ ते २८ फेब्रुवारी, २०२५ या कालावधीत प्राप्त होणाऱ्या दस्ताऐवजांचे संगणकीकरण करण्यासाठी संदर्भ क्र.१ अन्वये, प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. त्यानुषंगाने, सदर संगणकीकरण करण्यास येणाऱ्या खर्चास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

शासन निर्णयः-

दि. ०१ मार्च, २०२४ ते दि. २८ फेब्रुवारी, २०२५ पर्यंतची योग्यता प्रमाणपत्रे व नाटय संहिता / नोंदवहया संगणकीकरण करण्यासाठी येणारा खर्च रुपये २,१०,०००/- (रुपये दोन लक्ष दहा हजार फक्त ) इतक्या निधीस या शासन निर्णयान्वये वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

**०२.** सदर खर्चास वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला, उपविभाग तीन अ.क्र.४ नियम क्र.२७ (२) (अ) नुसार प्रशासकीय विभागास प्राप्त प्राधिकारानुसार मान्यता देण्यात येत आहे.

**०३.** यासाठी होणारा खर्च "मागणी क्रमांक झेडडी-२, २२०५ कला व संस्कृती, (००) १०४, पुराभिलेख, (०२) रंगभूमी प्रयोग परिनिरीक्षण मंडळ, (०२) (०१) मराठी नाट्यसंहितांचे संगणकीकरण **(२२०५ ३१५२),** २० इतर प्रशासकीय खर्च या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाच्या उपलब्ध तरतुदीतून भागविण्यात यावा.

**०४.** हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.५११/का-१४४३, दि.०९.१२.२०२४ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ५८/२०२५/व्यय-१५,दि.३०.०१.२०२५ अन्वये, दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

**०५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध झाला असून, त्याचा सांकेतांक क्रमांक २०२५०२१३१७५५०२७५२३ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANIROODHA SURYAKANT DESHPANDE

Digitally signed by ANIROODHA SURYAKANT DESHPANDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=d34fa92fd12dd57b9647dbd172129b5c0eb8b1cd7ff442b98831311214458302, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=0D09B1312327B281B742D56CD04EE1899269D4FAAF88991AC3364BDCC437CF37, cn=ANIROODHA SURYAKANT DESHPANDE
Date: 2025.02.13 17:58:01 +05'30'

**(अनिरुध्द सू. देशपांडे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत:**

१. अपर मुख्य सचिव, सांस्कृतिक कार्य यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
२. उप सचिव, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
३. सचिव, रंगभूमी प्रयोग परिनिरीक्षण मंडळ, मुंबई
४. महालेखापाल, (लेखा अनुज्ञेयता) एक, महाराष्ट्र, मुंबई
५. महालेखापाल, (लेखा परिक्षा) एक, महाराष्ट्र, मुंबई
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
७. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
८. उप सचिव (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई (यांना उक्त अनुदानाची रक्कम अर्थसंकल्प वितरण प्रणालीव्दारे उपलब्ध करुन देण्यासंदर्भातील कार्यवाहीसाठी अग्रेषित)
९. निवडनस्ती (सां.का.१).